**डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वास्तव्य केलेले लंडनस्थित घर खरेदी करण्यासाठी Asking Price च्या १०% रक्कम सॉलिसिटर यांना अदा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन,

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक - विघयो-२०१५/प्र.क्र.३०/विघयो,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई -- ४०० ०३२.

दिनांक :- १८ फेब्रुवारी,२०१५

**वाचा:-** शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विघयो-२०१४/प्र.क्र.८०/विघयो दिनांक १६ फेब्रुवारी, २०१५

**प्रस्तावना**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सन १९२१-२२ मध्ये वास्तव्य केलेले लंडनस्थित १० किंग्ज हेन्री रोड, एन.डब्ल्यु. ३, लंडन येथील घर खरेदी करण्यास मा. मंत्रिमंडळाने दि. ३/२/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत तत्वत: मान्यता दिलेली आहे.

२. सदर वास्तू घर मालकाने दि. १/९/२०१४ रोजी विक्रीस काढली असून त्यासाठी अन्य खरेदीदारांनी सर्व प्रक्रिया पूर्ण करण्याची तयारी दर्शविली आहे. त्यामुळे सदर वास्तु खरेदीत राज्य शासनाने स्वारस्य असल्याचे संबंधितांस कळवून त्यासाठी Asking Price च्या १०% रक्कम तातडीने अदा करणे आवश्यक आहे. या करीता मा. मंत्री, सामाजिक न्याय यांच्या दि. ३/२/२०१५ च्या पत्रान्वये Mr. Simon Ross, Managing Partner, Seddon Solicitors, 5 Portman Square, London W1H 6NT यांची सॉलिसिटर म्हणून नियुक्ती केली आहे. सदरहू नियुक्तीस M/s. Seddons यांनी त्यांच्या दि. ३/२/२०१५ च्या पत्रान्वये सहमती दर्शविली आहे. तसेच त्यांनी त्यांचे बँक खाते व SWIFT CODE, SORT CODE इत्यादी आवश्यक बाबी कळविल्या आहेत.

शासनस्तरावर विहित प्रक्रीया अवलंबून सदर प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यास काही कालावधी लागणार आहे. त्यामुळे राज्य शासनाने तातडीने कार्यवाही करण्याच्या दृष्टीने मा. मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करण्यासाठी मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीची दि. १६/२/२०१५ रोजी व्हिडिओ कॉन्फरन्सद्वारे बैठक झाली. सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वास्तव्य केलेले

लंडन येथील घर खरेदी करण्यासाठी Asking Price च्या १०% रक्कम या विभागाच्या महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळाच्या भाग भांडवलाच्या रकमेततून अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. त्यास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय:-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी वास्तव्य केलेले लंडन येथील घर खरेदी करण्यासाठी (Asking price) च्या १० टक्के रकम अदा करण्यासाठी महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळाच्या भागभांडवलाच्या रकमेतून अंदाजे Asking price £ ३.१ मिलियन च्या१०% म्हणजेच रुपये ३.१० कोटी (अक्षरी रुपये तीन कोटी दहा लाख फक्त) इतकी रक्कम Seddon यांच्या बँक खात्यावर जमा करावी. त्याबाबतचा तपशिल पुढीलप्रमाणे :-

Seddons Solicitors
BARCLAYS BANK PLC (Corporate 2)
Address :- Broadgate (Corporate2)
BROADGATE 2
155 Bishopsgate
London
EC2M3XA
Sort Code: 20- 77 – 67
Swift Code: BARCGB22
Sterling Client Premium A/c No. 10156655
lban No: GB60 BARC 20 77 6710 1566 55

सदर रक्कम रुपये ३.१० कोटी (अक्षरी रुपये तीन कोटी दहा लाख फक्त) ची प्रतीपूर्ती शासनामार्फत महामंडळास करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१८१२१११४०४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2015.02.18 13:11:56 +05'30'

( दि.रा.डिंगळे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

३) मा. मंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

८) सह सचिव, (सा.न्या) महामंडळे

९) व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ, जुहू सुप्रिम शॉपिंग सेंटर, गुलमोहर क्रॉस रोड नं. ९,जे.व्ही.पी.डी. स्कीम,जुहू, मुंबई-४०००४९.

१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

११) निवड नस्ती (विघयो)